सिंचन व इतर प्रकल्पांसाठी खाजगी क्षेत्रातील जमीन खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी पद्धतीने ताब्यात घेण्याच्या अनुषंगाने अनुसरावयाची कार्यपद्धती.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. एलक्यूएन-०१/२०१७/प्र.क्र.१२/अ-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २५ जानेवारी, २०१७.

परिपत्रक-

राज्य शासनाच्या सिंचन व इतर प्रकल्पांसाठी खाजगी क्षेत्रातील जमीन, खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी पद्धतीने ताब्यात घेण्याच्या अनुषंगाने, महसूल व वन विभाग, शासन निर्णय दिनांक १२.०५.२०१५ व ३०.०९.२०१५ अन्वये मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्यात आलेली आहेत. सदर मार्गदर्शक सूचनानुसार खाजगी क्षेत्रातील जमिनी, खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी पद्धतीने ताब्यात घेताना काही अडचणी येत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आणण्यात आलेली आहे. प्रकल्पासाठी खाजगी क्षेत्रातील जमिनी ताब्यात घेताना करावयाच्या अभिहस्तांतरण पत्र / खरेदी खताच्या (Sale Deed) अनुषंगाने तसेच जमिनीचा कायदेशीर शोध अहवाल याबाबत उद्भवणाऱ्या अडचणी या सर्व अडचणीचा सारासार विचार करून व सदर कार्यवाहीमध्ये सुसुत्रता आणण्यासाठी खाजगी क्षेत्रातील जमिनी, खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी पद्धतीने ताब्यात घेण्यासाठीची कार्यपद्धती खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

(१) **जिल्हाधिकारी कार्यालयाकडे प्रस्ताव दाखल करणे** :-

**अ)** संबंधित प्रादेशिक विभागाच्या / प्राधिकरणाच्या / महामंडळाच्या प्राधिकृत अधिकारी यांनी कार्यान्वित प्रकल्पासाठी शासन निर्णय दिनांक १२.०५.२०१५ व दिनांक ३०.०५.२०१५ च्या तरतुदीप्रमाणे खाजगी जमिनी खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी पद्धतीने घेण्याबाबतचा प्रस्ताव विहित नमुन्यात व आवश्यक त्या कागदपत्रांसह जिल्हाधिकारी कार्यालयास सादर करावा. सोबत प्रस्तावाचा विहीत नमूना जोडला आहे.

**ब)** जिल्हाधिकारी यांनी सदर प्रस्तावाची तपासणी करावी व सदर प्रस्तावाबाबत पुढील कार्यवाही करण्यासाठी त्यांच्या अधिनस्त उपविभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) यांची नियुक्ती करावी.

(२) **जाहीर नोटीस प्रसिद्ध करणे** :-

**अ)** उपविभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) यांनी खाजगी जमीन खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी पद्धतीने घेण्याबाबत प्रादेशिक विभागाच्या / प्राधिकरणाच्या / महामंडळाच्या पॅनल वरील वकील अथवा सरकारी वकील यांनी मान्यता दिलेल्या जाहीर नोटीसीचा मसुदा विचारात घ्यावा. सदर जाहीर नोटीशीचा मसूदा प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने / महामंडळाने, उपविभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) यांना विनाविलंब उपलब्ध करून देणे त्यांच्यावर बंधनकारक राहील.

**ब)** उपविभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) यांनी खाजगी जमिनी खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी पद्धतीने घेण्याबाबत जाहीर नोटीस पुढीलप्रकारे प्रसिद्ध करावी :-

(एक) जिल्ह्यात मोठ्या प्रमाणात वितरीत होणाऱ्या दोन (२) स्थानिक भाषेतील दैनिकांमध्ये;

(दोन) जिल्हाधिकारी, उपविभागीय अधिकारी, तहसिलदार, गाव चावडी, स्थानिक प्राधिकरणे, प्राधिकृत अधिकारी यांच्या कार्यालयाच्या दर्शनी भागात;

(तीन) संबंधित प्रादेशिक विभाग/ प्राधिकरण / महामंडळाच्या संकेतस्थळावर;

(चार) उपविभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) ठरवील, त्याप्रमाणे इतर कोणत्याही प्रकारे.

(३) **<u>भूधारकांची संमती (विकल्प) घेणे</u>** :-

संबंधित भूधारकांकडून शासनाच्या प्रचलित धोरणाप्रमाणे खाजगी जमिनी खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी देण्याबाबत व जिल्हास्तरीय समितीने निश्चित केलेला मोबदला स्विकारण्यास तयार असल्याबाबतची संमतीपत्रे (विकल्प) उपविभागीय अधिकारी / उप जिल्हाधिकारी (भूसंपादन) व संबंधित प्राधिकृत अधिकारी यांनी प्राप्त करावीत. संबंधित प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने / महामंडळाने उपलब्ध करून दिलेल्या संमतीपत्राचा (विकल्प) मसुदा विचारात घ्यावा.

(४) **<u>संयुक्त मोजणी करणे</u>** :-

**अ)** संबंधित प्रादेशिक विभागाच्या / प्राधिकरणाच्या /महामंडळाच्या प्राधिकृत अधिकारी यांनी प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट खाजगी जमिनीचे सिमांकन करावे.

**ब)** सिमांकन केल्यानंतर उपविभागीय अधिकारी / उप जिल्हाधिकारी (भूसंपादन) यांनी प्रस्तावातील नमूद प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट असलेल्या खाजगी जमिनीच्या संयुक्त मोजणीची कार्यवाही करावी.

**क)** सदर संयुक्त मोजणीची कार्यवाही करतांना प्रकल्पासाठी आवश्यक खाजगी जमिनीस लागून शासकीय / निम शासकीय / वन जमीन असल्यास त्या संबंधित विभागाचे अधिकारी संयुक्त मोजणीच्या वेळी उपस्थित असणे आवश्यक राहील. तसेच संबंधित प्राधिकृत अधिकारी, महसूल विभाग, कृषी विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग व इतर विभाग यांचे अधिकारी / प्रतिनिधी उपस्थित असणेही आवश्यक असेल. त्यासाठी संबंधित प्रादेशिक विभाग / प्राधिकरण /महामंडळ यांनी संबंधितांना आगाऊ स्वरूपात लेखी पत्राने कळवावे.

**ड)** संबंधित प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने /महामंडळाने उक्त जमिनीच्या संयुक्त मोजणीसाठी आवश्यक मोजणी शुल्क भूमी अभिलेख कार्यालयाकडे त्वरीत जमा करावे. जेणेकरून संयुक्त मोजणीची कार्यवाही त्वरेने पूर्ण करणे शक्य होईल.

**इ)** भूमी अभिलेख विभागाने, संबंधित प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने /महामंडळाने, संयुक्त मोजणी सल्लागार नियुक्त केला असल्यास, जमिनीच्या संयुक्त मोजणीची कार्यवाही त्यांच्या सहाय्याने विहित कालावधीत पूर्ण करावी. सदर सल्लागाराकडून त्यांच्या करारनाम्यामध्ये विहित केलेल्या रीतीने संयुक्त मोजणीची कार्यवाही पूर्ण करून घ्यावी. संबंधित प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने /महामंडळाने ज्या प्रकल्पाकरीता अशा सल्लागाराची नियुक्ती केली नसेल, त्या प्रकल्पांमध्ये समाविष्ट जमिनीच्या संयुक्त मोजणीची कार्यवाही भूमी अभिलेख विभागाने पूर्ण करावी.

(५) **<u>कायदेशीर शोध अहवाल (Legal Search Report)</u>** :-

**अ)** संबंधित प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने / महामंडळाने खाजगी जमिनींचे सर्व्हे नंबर / गट क्रमांक निहाय सन १९५० पासून आजतागायत पर्यंतचे महसूल अभिलेख (गाव नमुना नं.७/१२, फेरफार नोंदी, गट बुक नकाशा, इ.) याचा तपशील तहसीलदार / संबंधित महसूल कार्यालयाकडून प्राप्त करावा.

**ब)** संबंधित प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने / महामंडळाने खाजगी जमिनींचे सर्व्हे नंबर / गट क्रमांक निहाय गत ३० (तीस) वर्षातील नोंदणीकृत दस्तऐवजांचा तपशील (खरेदीखते, गहाणखते, बक्षिसपत्र, मृत्यूपत्र, दानपत्र, इ.) दुय्यम निबंधक कार्यालयाकडून प्राप्त करावा.

**क)** उपविभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) यांनी उक्त अभिलेखावरून खाजगी जमिनींच्या कायदेशीर शोध अहवालाचा (Legal Search Report) प्रारूप मसुदा तयार करून, त्यास जिल्हा सरकारी वकील / संपादक संस्थेच्या पॅनलवरील वकील यांची मान्यता घ्यावी.

(६) **<u>मूल्यांकन</u>** :-

**अ)** संबंधित प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने / महामंडळाने खाजगी जमिनींचे सर्व्हे नंबर / गट क्रमांक निहाय गत ३ (तीन) वर्षातील नोंदणीकृत खरेदीखतांच्या दस्तऐवजांचा तपशील दुय्यम निबंधक कार्यालयाकडून प्राप्त करावा.

**ब)** संबंधित प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने / महामंडळाने खाजगी जमिनींचे सर्व्हे नंबर / गट क्रमांक निहाय गत ३ (तीन) वर्षातील नोंदणीकृत खरेदीखतांच्या आधारे प्रमाणित फेरफार नोंदीच्या अनुषंगाने खरेदी-विक्री व्यवहाराचा तपशील (नोंदणीकृत दस्त क्रमांक व दिनांक, खरेदी मूल्य, इ.) तहसीलदार कार्यालयाकडून प्राप्त करावा.

**क)** संबंधित प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने / महामंडळाने चालू वर्षाच्या शिघ्रसिद्धगणकाच्या प्रती दुय्यम निबंधक कार्यालयाकडून / नोंदणी महानिरीक्षक कार्यालयाच्या संकेत स्थळावरून प्राप्त कराव्यात.

**ड)** संबंधित प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने / महामंडळाने शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, दिनांक २६.०५.२०१५ प्रमाणे भूमिसंपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहत करताना उचित भरपाई मिळण्याचा आणि पारदर्शकतेचा हक्क अधिनियम, २०१३ प्रमाणे संपादनामध्ये समाविष्ट जमिनीचे विनिर्दिष्ट क्षेत्र व त्या जमिनीचे बाजारमूल्य ज्या घटकाद्वारे (गुणांकाद्वारे) गुणले जाणार आहे अशा घटकाचा (गुणांकाचा) तपशील सहाय्यक संचालक, नगररचना कार्यालयाकडून प्राप्त करावा.

**इ)** संबंधित प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने / महामंडळाने संयुक्त मोजणी पत्रकामध्ये अंतर्भूत बांधकामे, फळझाडे, वनझाडे, पिके, इत्यादी बाबींचा मूल्यांकन अहवाल संबंधित विभागाच्या सक्षम अधिकारी यांचेकडून प्राप्त करावा.

**ई)** उपरोक्त बाबी व शासनाचे प्रचलित धोरण विचारात घेऊन, उपविभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) यांनी जमिनींचा मूल्यांकन तक्ता / अहवाल तयार करून, त्यास सहाय्यक संचालक, नगररचना यांची मान्यता घ्यावी.

(७) **<u>मोबदला निश्चितीसाठी जिल्हास्तरीय समिती</u>** :-

**अ)** जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीची बैठक उपविभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) यांनी आयोजित करून खाजगी जमिनी खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी पद्धतीने घेण्याबाबतचा प्रस्ताव अनुषंगिक कागदपत्रांसह सदर समितीसमोर मोबदला निश्चितीसाठी सादर करावा.

**ब)** उपविभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) यांनी जिल्हास्तरीय समितीच्या बैठकीचे इतिवृत्त तयार करावे. तसेच, महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-०४/२०१६/प्र.क्र.४९/अ-२, दिनांक २६.०५.२०१६ प्रमाणे भोगवटादार वर्ग-२ / नियंत्रित सत्ता प्रकार अशा प्रकारच्या धारणाधिकारांच्या जमिनी खरेदी करण्याबाबत जिल्हाधिकारी यांनी आवश्यक ते आदेश निर्गमित करावेत. त्या अनुषंगाने शासनास भरणा करावयाच्या रकमांचा तपशील व भूधारकांना देय मोबदला रकमांचा तपशील निश्चित करावा.

(८) **<u>अभिहस्तांतरण पत्र /खरेदीखत (Sale Deed) करणे</u>** :-

**अ)** उपविभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) यांनी कायदेशीर शोध अहवालाच्या (Legal Search Report) आधारे खाजगी जमिनीसंदर्भात कोणताही न्यायालयीन विवाद नसल्याची व खरेदी प्रक्रियेसाठी कोणतीही बाधा येत नसल्याची खात्री करावी.

**ब)** वरील **–अ॰** बाबतची खात्री पक्की झाल्यानंतर, संबंधित प्रादेशिक विभागाच्या / प्राधिकरणाच्या / महामंडळाच्या प्राधिकृत अधिकाऱ्यांनी जिल्हास्तरीय समितीने निश्चित केलेली मोबदला रक्कम भूधारकांना

अदा करण्यापूर्वी, विहित नमुन्यात भूधारकांकडून क्षतिपूर्ती बंधपत्र (Indemnity Bond) घेण्याची कार्यवाही करावी.

**क)** संबंधित भूधारकांकडून क्षतिपूर्ती बंधपत्र (Indemnity Bond) घेतल्यानंतर, संबंधित प्रादेशिक विभागाच्या / प्राधिकरणाच्या / महामंडळाच्या प्राधिकृत अधिकाऱ्यांनी देय रक्कम संबंधित भूधारकांच्या बँक खात्यामध्ये जमा करावी.

**ड)** प्रादेशिक विभागाने / प्राधिकरणाने / महामंडळाने खरेदीखतासाठी मुद्रांक शुल्क व नोंदणी फी पूर्णपणे दुय्यम निबंधक कार्यालयाकडे जमा करावी.

**इ)** वरीलप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता झाल्यानंतर, संबंधित प्रादेशिक विभागाच्या / प्राधिकरणाच्या / महामंडळाच्या प्राधिकृत अधिकारी व संबंधित भूधारक यांनी अभिहस्तांतरण पत्र / खरेदी खत (Sale Deed) यांची नोंदणी संबंधित दुय्यम निबंधक कार्यालयामध्ये करावी. खरेदी खतामध्ये क्षतिपूर्ती बंधपत्र (Indemnity Bond), देय मोबदला अदा केल्याचा तपशील व अनुषंगिक बाबी नमूद कराव्यात व त्याबाबतची कागदपत्रे दस्ताचा भाग म्हणून खरेदीखतामध्ये समाविष्ट कराव्यात. अशा नोंदणीकृत खरेदी खताच्या मूळ प्रती प्राप्त कराव्यात.

(९) **<u>अधिकार अभिलेख अद्ययावत करणे</u>** :-

**अ)** संबंधित प्रादेशिक विभागाच्या / प्राधिकरणाच्या / महामंडळाच्या प्राधिकृत अधिकारी यांनी नोंदणीकृत खरेदीखताच्या आधारे जमिनीच्या अधिकार अभिलेखामध्ये संबंधित प्रादेशिक विभागाचे / प्राधिकरणाचे / महामंडळाचे नावे दाखल करण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करावी.

**ब)** अधिकार अभिलेख अद्ययावत केल्याबाबतचे महसूली अभिलेख (गाव नमुना नं.७/१२, फेरफार नोंदी, इ.) संबंधित प्रादेशिक विभागाच्या / प्राधिकरणाच्या / महामंडळाच्या प्राधिकृत अधिकाऱ्यांनी उपलब्ध करून घ्यावेत.

(१०) **<u>दस्तऐवज जतन करणे</u>** :-

**अ)** संबंधित प्रादेशिक विभागाच्या / प्राधिकरणाच्या / महामंडळाच्या प्राधिकृत अधिकारी यांनी खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी पद्धतीने जमिनी घेण्याबाबत संबंधित कार्यालये / विभागांमार्फत केलेल्या सर्व कार्यवाहीसंबंधीचे अहवाल, इतिवृत्त, दस्त, नकाशे व अनुषंगिक कागदपत्रे कायम अभिलेख (Permanent Record) म्हणून जतन करावीत.

**ब)** वरील दस्तऐवजांच्या प्रती (Soft Copy सह) जतन कराव्यात.

सबब, खाजगी जमिनी खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी पद्धतीने ताब्यात घेण्याच्या अनुषंगाने वरील विहीत कार्यपद्धतीचे काटेकोरपणे पालन करण्याबाबत सर्व संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या अधिपत्याखालील उपविभागीय अधिकारी / उपजिल्हाधिकारी (भूसंपादन) व इतर कर्मचारी यांच्या निदर्शनास आणण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०१२५१८०६०७४११९ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Subhash K Gawade

Digitally signed by Subhash K Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=40b8b2876e2135f5b158b877f59754b2a7ddf64e0cf59f2dc33ad60b8bce5bcd, cn=Subhash K Gawade
Date: 2017.01.25 18:04:34 +05'30'

**( सु.कि.गावडे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मंत्री (महसूल) / मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
४) सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) विभागीय आयुक्त, कोकण विभाग / पुणे / नाशिक / अमरावती / औरंगाबाद / नागपूर
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई
७) सर्व जिल्हाधिकारी
८) सर्व मंत्रालयीन विभाग,
९) कार्यासन (अ-१, अ-३, अ-४)
१०) निवड नस्ती (अ-२).

## अनुक्रमणिका

| अ.क्र. | तपशिल | | पृष्ठ क्र. | |
|---|---|---|---|---|
| | | | पासून | पर्यंत |
| १ | **नमुना 'क'** | .................................................................. साठी खाजगी जमिन खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी करण्यासाठीचा प्रस्ताव | | |
| २ | **परिशिष्ट १** | अनुसूची-१ - प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनींचा तपशील | | |
| ३ | **परिशिष्ट १** | अनुसूची-२ - प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनींचा गोषवारा | | |
| ४ | **परिशिष्ट २** | प्रस्तावामध्ये समाविष्ट खाजगी जमिनीचा तपशील | | |
| ५ | **परिशिष्ट ३** | प्रमाणपत्र | | |
| ६ | **परिशिष्ट ४** | प्रशासकीय मान्यता आदेश | | |
| ७ | **परिशिष्ट ५** | चिन्हांकित / साक्षांकित गाव नकाशावर प्रकल्पाची आखणी दर्शविणारा नकाशा | | |
| ८ | **परिशिष्ट ६** | प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनींच्या चतु:सिमा दर्शविणारा तक्ता | | |
| ९ | **परिशिष्ट ७** | प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनीचे गाव नमुना नं. ७/१२ चे उतारे | | |

**नमुना 'क'**

**.....................................................................साठी खाजगी जमिन**

**खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी करण्यासाठीचा प्रस्ताव.**

| अ.क्र. | विषय | | तपशील |
|---|---|---|---|
| १ | प्रस्ताव पाठविणाऱ्या अधिका-याचे नाव व पत्ता | :- | |
| २ | खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी करणाऱ्या प्रादेशिक विभागाचे / प्राधिकरणाचे / महामंडळाचे नाव व पत्ता | :- | |
| ३ | मंत्रालयीन स्तरावरील संबंधित प्रशासकीय विभाग | :- | |
| ४ | जमीन खरेदी कोणत्या कारणासाठी करून हवे आहे ? | :- | |
| ५ | जमीन खरेदी कोणत्या शासन धोरणानुसार करून हवे आहे ? | :- | |
| ६ | खरेदी करावयाच्या जमिनी ज्या क्षेत्रात मोडतात ते गाव, तालुका, जिल्हा. | :- | गाव . , ता. , जि. |
| ७ | खरेदी करून हवे असलेले एकूण क्षेत्र | :- | ........ हे.आर. / ...... चौ.मी. |
| ८ | गावनिहाय व गट/सर्व्हे क्र. नुसार आणि खरेदी क्षेत्राच्या चतु:सीमा दाखविणारी अनुसूची यासोबत जोडणे आवश्यक आहे, त्याप्रमाणे ती जोडली आहे काय ? | :- | होय / नाही. |
| ९ | खरेदी करावयाच्या क्षेत्राचा चिन्हांकित /साक्षांकित नकाशा या सोबत जोडणे आवश्यक आहे, त्या प्रमाणे जोडला आहे काय ? | :- | होय / नाही. |
| १० | खरेदी करावयाच्या क्षेत्राचे ७/१२ चे उतारे किंवा मालमत्ता नोंदवहीतील उतारा या सोबत जोडणे आवश्यक आहे, त्याप्रमाणे जोडण्यात आले आहेत काय ? | :- | होय / नाही. |
| ११ | खरेदी करावयाच्या क्षेत्राचे सीमांकन करण्यात आले आहे काय ? असल्यास, सीमांकन प्रमाणपत्र सोबत जोडले आहे काय ? | :- | होय / नाही. |

| अ.क्र. | विषय | | तपशील |
|---|---|---|---|
| १२ | प्रस्तावामधील नमूद क्षेत्रासाठी भूसंपादन अधिनियम/ अन्य कायद्याच्या तरतूदीनुसार भूसंपादन प्रक्रिया सूरू करण्यात आलेली आहे काय ? | :- | होय / नाही. |
| १३ | क्र.१२ चे उत्तर -होय॰ असल्यास, संबंधित भूसंपादन कायदा व प्रस्तावित क्षेत्र नमूद करावे. | :- | |
| १४ | गरजेनुसार आवश्यक तेवढेच क्षेत्र खरेदी करून मागितले आहे काय ? त्याबाबत प्रमाणपत्र सोबत जोडावे. | :- | होय / नाही. |
| १५ | सबंधित प्रयोजनासाठी जवळपास कमी खर्चाची अन्य खाजगी किंवा सरकारी जमीन उपलब्ध आहे काय ? असल्यास, किती अंतरावर आहे ? | :- | होय / नाही. |
| १६ | खरेदी करून मागितलेली जमीन रेल्वे सीमांच्या जवळपास आहे काय? असल्यास, किती अंतरावर आहे ? | :- | होय / नाही. |
| १७ | खरेदी क्षेत्रात धार्मिक, प्रार्थना स्थळे, मंदिरे, कब्रस्थान व स्मशानभूमी किंवा पवित्र स्मारके येतात काय ? खरेदी क्षेत्राच्या जवळपास अशा बाबी असल्यास, किती अंतरावर आहेत ? | :- | होय / नाही. |
| १८ | खरेदी करावयाच्या क्षेत्रातून कोणताही सार्वजनिक मार्गाधिकार, जलप्रवाह, जलवाहिनी किंवा जलनिःसारण मार्ग जातो काय ? किंवा खास काही अडथळा निर्माण होतो काय ? | :- | होय / नाही. |
| १९ | नागरी क्षेत्रात इमारतीमधील खाजगी प्रवेश मार्गाचे किंवा पूर्वापार प्रकाशमार्ग आणि / किंवा हायवेचे मार्ग यावरील कोणत्याही अधिकारात अडथळा येणेचा संभव आहे काय ? | :- | होय / नाही. |
| २० | खरेदी क्षेत्राच्या सभोवार इमारत किंवा कारखाना यांना किंवा त्यांची जागा छेदून जाते काय ? | :- | होय / नाही. |

| अ.क्र. | विषय | | तपशील |
|---|---|---|---|
| २१ | प्रादेशिक विभाग / प्राधिकरण / महामंडळाचा प्राधिकृत अधिकाऱ्याचा तपशील | :- | नाव :-<br>पदनाम :-<br>पत्ता :-<br><br>भ्रमणध्वनी क्र. :-<br>कार्यालयीन दूरध्वनी क्र. :-<br>ई-मेल पत्ता :- |

दिनांक :-

ठिकाण :-

**(नाव व पदनाम)**
**प्रादेशिक विभाग / प्राधिकरण / महामंडळाचे प्राधिकृत अधिकारी**

## परिशिष्ट-१

### अनुसूची-१

### प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनींचा तपशील

**गाव :** **तालुका :** **जिल्हा :**

| अ.क्र. | भूधारकाचे नाव | गट/सर्व्हे क्रमांक | भूधारणा पद्धती | गा.न.नं. ७/१२ प्रमाणे एकूण क्षेत्र (हे.आर.) | खरेदी करावयाचे क्षेत्र (हे.आर.) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | | |
| | | | | | |
| एकूण | | | | | |

दिनांक :-

ठिकाण :-

**(नाव व पदनाम)**
**प्रादेशिक विभाग / प्राधिकरण /**
**महामंडळाचे प्राधिकृत अधिकारी**

### अनुसूची-२

### प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनींचा गोषवारा

**गाव :** **तालुका :** **जिल्हा :**

| अ.क्र. | जमिनीचा प्रकार | खरेदी करावयाचे एकूण क्षेत्र (हे.आर.) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | खाजगी जमीन | |
| २ | सरकारी जमीन | |
| ३ | केंद्र / राज्य शासनाच्या अखत्यारीतील सार्वजनिक उपक्रमाकडील जमीन | |
| ४ | केंद्र / राज्य शासनाच्या विभागाकडील जमीन | |
| ४ | वन जमीन | |
| ५ | स्थानिक स्वराज्य संस्थाकडील जमीन | |
| ६ | अन्य जमिनी | |
| एकूण | | |

दिनांक :-

ठिकाण :-

**(नाव व पदनाम)**
**प्रादेशिक विभाग / प्राधिकरण /**
**महामंडळाचे प्राधिकृत अधिकारी**

परिशिष्ट-२

प्रस्तावामध्ये समाविष्ट खाजगी जमिनीचा तपशील

गाव : तालुका : जिल्हा :

| अ.क्र. | भूधारकाचे नाव | गट/सर्व्हे क्रमांक | भूधारणा पद्धती | गा.न.नं. ७/१२ प्रमाणे एकूण क्षेत्र (हे.आर.) | खरेदी करावयाचे क्षेत्र (हे.आर.) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | | |
| | | | | | |
| एकूण | | | | | |

दिनांक :-

ठिकाण :-

(नाव व पदनाम)
प्रादेशिक विभाग / प्राधिकरण / महामंडळाचे
प्राधिकृत अधिकारी

## परिशिष्ट-३
## प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की,........................................................................ प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट असलेल्या प्रस्तावित जमिनीचे सीमांकन करण्यात आले आहे. प्रस्तावित जमिनीचा ताबा खाजगी वाटाघाटीने अथवा अन्य कोणत्याही मार्गाने घेतलेला नाही.

प्रस्तावामध्ये समाविष्ट भूधारकांच्या जमिनी खाजगी वाटाघाटीद्वारे थेट खरेदी केल्यानंतर, सदर भूधारक भूमिहीन / अल्पभूधारक होत नाहीत. तथापि, प्रस्तावित जमिनीची संयुक्त मोजणी झाल्यानंतर, भूधारक भूमिहीन / अल्पभूधारक होतात अगर कसे? याची त्या भूधारकांनी अन्य ठिकाणी धारण केलेल्या क्षेत्राची पडताळणी करून निश्चिती करण्यात येईल.

प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट वन जमीनी वन विभागाकडून हस्तांतरीत करण्याबाबत आणि त्याप्रमाणे आवश्यक कार्यवाही प्रादेशिक विभाग / प्राधिकरण / महामंडळाच्या वतीने स्वतंत्र्यरित्या कार्यान्वित करण्यात येत आहे.

प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट शासकीय जमिनी / इतर विभागाच्या जमिनी महामंडळास हस्तांतरीत करण्याबाबत आणि त्याप्रमाणे आवश्यक कार्यवाही प्रादेशिक विभाग /प्राधिकरण/ महामंडळाच्या वतीने स्वतंत्र्यरित्या कार्यान्वित करण्यात येत आहे.

सदरचा प्रस्ताव यापूर्वी प्रादेशिक विभाग / प्राधिकरण/ महामंडळामार्फत दाखल करण्यात आलेला नाही.

दिनांक :-
ठिकाण :-

**(नाव व पदनाम)**
**प्रादेशिक विभाग / प्राधिकरण / महामंडळाचे**
**प्राधिकृत अधिकारी**

---

## परिशिष्ट-४
## प्रशासकीय मान्यता आदेश

प्रशासकीय मान्यता आदेशाची प्रत सोबत जोडण्यात यावी.

दिनांक :-
ठिकाण :-

**(नाव व पदनाम)**
**प्रादेशिक विभाग / प्राधिकरण / महामंडळाचे**
**प्राधिकृत अधिकारी**

## परिशिष्ट-५

चिन्हांकित / साक्षांकित गाव नकाशावर प्रकल्पाची आखणी दर्शविणारा नकाशा

........................................................................................................................

## परिशिष्ट-६

प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनींच्या चतु:सिमा दर्शविणारा तक्ता

गाव : तालुका : जिल्हा :

| अ.क्र. | गट / सर्व्हे क्रमांक | खरेदी क्षेत्राच्या चतु:सिमेस असलेले गट / सर्व्हे क्रमांक | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | पूर्व | पश्चिम | दक्षिण | उत्तर |
| | | | | | |
| | | | | | |

दिनांक :-

ठिकाण :-

(नाव व पदनाम)
प्रादेशिक विभाग / प्राधिकरण / महामंडळाचे
प्राधिकृत अधिकारी

---

## परिशिष्ट-७

प्रकल्पाच्या आखणीमध्ये समाविष्ट जमिनीचे गाव नमुना नं. ७/१२ चे उतारे

*****